


# जुन्या शालीचं काय झालं?

**Author:** Arvind Gupta
**Illustrator:** Debasmita Dasgupta
**Translator:** Varsha Gajendragadkar

वाचन पातळी ३



एक दिवस गौतम बुद्ध मठाभोवती चक्कर मारत होते.

त्यांना पाहून एक भिक्षू त्यांच्या जवळ आला अणि आपल्याला
नवी शाल हवी असल्याचं त्यानं बुद्धांना सांगितलं.



बुद्धांनी त्याला विचारलं, "तुझ्या आधीच्या शालीला काय झालं?"

"खूप जुनी, फाटकी झाली होती ती. त्यामुळे मी ती बेडशीट म्हणून वापरतोय," भिक्षूनं उत्तर दिलं.



बुद्धांनी पुन्हा विचारलं, "पण तुझ्या जुन्या बेडशीटचं काय झालं?"

"भगवान, ते वापरून वापरून जीर्ण झालं. पार फाटलं होतं, म्हणून मी कापून त्याचा उशीचा अभ्रा तयार केला." भिक्षूनं उत्तर दिलं.



"पण हा नवा अभ्रा शिवण्याआधी उशीला अभ्रा होताच ना? मग त्या आधीच्या अभ्र्याचं तू काय केलंस?"
बुद्धांनी विचारलं.

"त्या अभ्र्यावर माझं डोकं कित्येक लाख वेळा
घासलं गेलं असेल, भगवान. त्यामुळे त्याला एक मोठं भोक पडलं होतं.
म्हणून मी त्याचं पायपुसणं बनवलं."
भिक्षूनं अगदी प्रामाणिकपणे सांगितलं.



गौतम बुद्धांचं या उत्तरानं समाधान
काही झालं नाही. ते नेहमी कुठल्याही
प्रश्नाच्या मुळापर्यंत जायचे.

त्यांनी भिक्षूला विचारलं,
"मला सांग, तू जुन्या
पायपुसण्याचं काय केलंस?"



भिक्षूनं हात जोडले आणि म्हणाला, "भगवान, जुन्या पायपुसण्याच्या अगदी चिंध्या झाल्या होत्या. वापरून वापरून धागे उसवून आतलं अस्तर बाहेर आलं होतं.
मग मी सुती धागे काढून त्याची वात तयार केली.
नंतर तीच वात मी दिव्यात वापरली."

भिक्षूचं उत्तर ऐकून बुद्ध हसले. भिक्षूला मग नवी शाल मिळाली!




## स्वतःचा कापडी चेंडू स्वतःच बनवा

1. ज्यांचा वापर करता येईल असे घरातले जुने कपडे घ्या. त्यातून तुम्हाला दोन पंचकोन आणि चित्रात दाखविल्याप्रमाणे पाच पाकळ्या कापून काढायच्या आहेत. (एक पंचकोन काढा आणि त्याच्या शेजारी पाकळीचा आकार काढा. म्हणजे पंचकोनाच्या एका बाजूची लांबी ही पाकळ्यांच्या उंचीच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकाइतकी आहे, हे स्पष्ट होईल.)

2. हे तुकडे हाताने शिवा किंवा एखाद्या मोठ्या माणसाकडून ते मशिनवर शिवून घ्या. एका पंचकोनावर एक लहानसं भोक तयार करा.






3. आतली बाजू आता बाहेर काढा.

4. त्यात एक चांगला घट्टमुट्ट फुगा घाला आणि तो फुगवा.






5. फुग्याचं तोंड दुमडा, त्याची गाठ बांधा
आणि तो पंचकोनाच्या भोकातून आत घुसवा.

6. बघा! रंगीबेरंगी कापडी चेंडू तयार!



## धाग्यांची मौज!

सुती किंवा लोकरीच्या लहान लहान धाग्यांसोबत तासन् तास मजेत घालवायचा हा बघा सोपा उपाय!


1.

1. रिकामी काडेपेटी घ्या.

2. अंदाजे ७० सेंमी. लांबीचा लोकरीचा धागा काडेपेटीच्या एका कर्णाच्या लाम्बीतून ओवा.


2.




3. दुसऱ्या रंगाची लोकर दुसऱ्या कर्णातून ओवा.
दोन्ही धाग्यांची टोकं एकत्र बांधून टाका.

4. एखाद्या मित्राला किंवा मैत्रिणीला लोकरीच्या धाग्यांची दोन्ही टोकं धरायला सांगा.
आता तुम्ही त्यातून काडेपेटी हळूहळू सरकवत नेऊ शकता.






5. काय आश्चर्य! काडेपेटीतून बाहेर येताना
लोकर रंग बदलतेय असं वाटतं की नाही?

*अरविंद गुप्ता यांची अनेक पुस्तकं, आणि प्रयोग www.arvindguptatoys.com*
*या त्यांच्या संकेतस्थळावर विनामूल्य उपलब्ध आहेत.*



**पुनर्चक्रीकरण, पुनर्वापर, कचऱ्याची कमीत कमी निर्मिती**

आपण किती तरी वस्तू विकत घेत राहतो, आणि जास्त विचार न करता त्या वापरून टाकूनही देतो. आपल्या गरजेपेक्षा अधिक गोष्टी आपण खरेदी करतो. “भरपूर खरेदी करा! भरपूर कचरा करा!”

हा जणू आपला मंत्रच आहे. पाणी, झाडं, वाळू आणि माती यांसारख्या पृथ्वीवरच्या नैसर्गिक साधनसंपत्तीचा आपण गैरवापर करतो आणि कित्येक टन निरुपयोगी वस्तू निर्माण करून कचऱ्याचे डोंगर तयार करत राहतो.



पण आपली ही वृत्ती पहिल्यापासून अशीच होती का?
वस्तू वाया घालवणं हा आपला भारतीयांचा गुणधर्मच आहे का? नाही!
भारतीय लोक काटकसरी, सगळ्याचा निगुतीनं वापर करणारे आणि सुज्ञ असल्याचं आपला इतिहास सांगतो.

प्रत्येक वस्तूचे अनेक उपयोग असतात- ती अनेक पिढ्या उपयोगी पडते, असा आपला विश्वास आहे. पुनर्वापर आणि पुनर्चक्रीकरण या दोन्हीची मुळं भारतीय संस्कृतीत खोलवर रुजलेली आहेत.

ही गोष्टही अडीच हजार वर्षांपूर्वीची, भगवान गौतम बुद्धांच्या काळातली आहे. भौतिक जगाविषयीचा गाढ आदर आणि संवेदनशीलता स्पष्ट करणारी ही गोष्ट आहे. तिनं आपल्या
समोर अनेक धडे ठेवले आहेत.

Story Attribution:

This story: जुन्या शालीचं काय झालं? is translated by Varsha Gajendragadkar . The © for this translation lies with Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'What happened to the shawl?', by Arvind Gupta . © Pratham Books , 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

Other Credits:

'Junya Shaliche Kaay Zale' has been published on StoryWeaver by Pratham Books. The development of this book has been supported by Mahle Behr India Pvt Ltd. www.prathambooks.org

Illustration Attributions:

Cover page: Two monks standing together in a garden and smiling by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: Buddha in confusion and thinking on some questions by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Two monks standing together and smiling by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: A monk talking to Buddha about a bed by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: A monk sleeping on the floor, by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Feet of three people with one pair on a pillow, by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: A Buddhist monk in deep thought, by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Buddha gifting a shawl to a monk, by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: Two objects, one in pieces and the other stitched together, by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: Two objects made of pieces of cloth, one with a balloon, by Debasmita Dasgupta © Pratham Books, 2016. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

# जुन्या शालीचं काय झालं?
(Marathi)

भगवान गौतम बुद्धांच्या आयुष्यातली ही प्राचीन कथा निसर्ग-संवर्धनाचा फार मोठा धडा शिकवणारी आहे. नवी शाल घेण्यासाठी बुद्धांकडून परवानगी मिळवणं ही सोपी गोष्ट नाही, हे त्यांच्या अनुयायाच्या लक्षात येतं!

या पुस्तकाची वाचन पातळी ३ आहे. आपले आपण वाचू शकणाऱ्या मुलांसाठी.

